सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, अमरावती, जि.अमरावती या प्रशिक्षण संस्थेस अनुदान वितरित करणेबाबत. लेखाशिर्ष-२४१५ ०३३९. ३६-सहायक अनुदाने वेतन (दुसरा हप्ता)

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**

शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा २०२३/प्र.क्र.३४/आस्था-१५
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१.
दिनांक : २१ जुलै, २०२३.

वाचा : १) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र. ८४५/०९, दि.१७.०९.१९९३.
२) शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.प्रशिक्षण११९९/प्र.क्र.५८१/६१,दि. २३.९.१९९८
३) शासन परिपत्रक क्र.-ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक-प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.८५९/४४, दि.१२.६.२००१.
४) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक अर्थसं २०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२.०४.२०२३.
५) शासन निर्णय क्रमांक अनुग्रा २०२३/प्र.क्र.३४/आस्था १५, दि. १९.०४.२०२३.

**प्रस्तावना -**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता २४१५, कृषिविषयक संशोधन ०१- पीकसंवर्धन, १२०, इतर संस्थांना सहाय्य (०१) (०३) श्री शिवाजी शिक्षण संस्था, अमरावती यांच्या विद्यमाने अमरावती येथे ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र स्थापन करणे व त्याचा दर्जा वाढविणे (अनिवार्य) (संकेतांक क्र.२४१५ ०३३९), (मागणी क्र. एल-३) यांना ३१ सहाय्यक अनुदाने वेतनेतरसाठी रु.९४०.०० हजार (रुपये नऊ लक्ष, चाळीस हजार फक्त ) व ३६ सहाय्यक अनुदाने वेतनासाठी रु. ५५६५.०० हजार (रुपये पंचावन्न लक्ष, पासष्ठ हजार फक्त) असे एकूण रु.६५०५.०० हजार (रुपये पासष्ठ लक्ष, पाच हजार फक्त) इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. सदर अर्थसंकल्पित अनुदानापैकी दुसरा हप्ता वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३ नुसार सन२०२३-२४ या अर्थसंकल्पिय मंजूर अनुदानातून निधी वितरीत करण्याच्या वित्त विभागाच्या सूचना आहेत. त्याअनुषंगाने ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, शिवाजीनगर, अमरावती यांना आतापर्यंत अर्थसंकल्पिय तरतुदीच्या मर्यादेत ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाकरिता २०% मर्यादेत रु.१८८.०० हजार (रुपये एक लक्ष, अठ्ठ्याऐंशी हजार फक्त) तसेच ३६ सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाकरिता २०% मर्यादेत रक्कम रु. १११३.०० हजार (रुपये अकरा लक्ष, तेरा हजार फक्त) असे एकुण रु.१३०१.०० हजार (रुपये तेरा लक्ष, एक हजार फक्त) इतके अनुदान संदर्भ क्र.५ च्या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आले आहे.

२. आता, ३६ सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाकरीता अर्थसंकल्पिय तरतुदीच्या १४% मर्यादेत निधी वित्त विभागाकडून उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सदर मर्यादेस अधिन राहून ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, शिवाजीनगर, अमरावती यांना ३६ सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाकरीता अर्थसंकल्पिय तरतुदीच्या १४% मर्यादेत रु.७७९.१० हजार (रुपये सात लक्ष, एकोणऐंशी हजार, शंभर फक्त) इतका निधी दुसरा हप्ता म्हणून वितरित करण्यात येत आहे.

३. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग, क्रमांक प्रशिक्षण- ११९८/प्र.क्र.५८१/६१ दि.२३ सप्टेंबर, १९९८ व शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र.८५९/४४, दि.१२ जून २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुंषगाने उपायुक्त (आस्था), अमरावती विभाग, अमरावती यांनी सदर प्रशिक्षण केंद्रास दरमहा अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक १२ मधील अटीनुसार केंद्रानी खर्च करावा.

४. सदर निधी वितरणाकरिता तसेच निधी ज्या बाबींकरीता मंजूर करण्यात आला आहे, त्याच बाबींवर खर्च करण्यात येईल याची काटेकोर अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांची असेल. तसेच सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्रही तात्काळ सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

५. हा खर्च "मागणी क्र.एल ३, २४१५, कृषिविषयक संशोधन व शिक्षण०१- पिक संवर्धन, १२० इतर संस्थांना सहाय्य(०१) (०३) श्री शिवाजी शिक्षण संस्था, अमरावती यांच्या विद्यमाने अमरावती येथे ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र स्थापन करणे व त्याचा दर्जा वाढविणे (अनिवार्य) (संकेतांक क्र. २४१५ ०३३९), ३६ सहाय्यक अनुदाने (वेतन)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो यावर्षी लेखाशिर्षांतर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच सदर खर्च त्याच संकेतांकाखाली खर्च पडतो आहे या बाबत ताळमेळ घालून खातरजमा करावी व विभागीय आयुक्तांनी दरमहा शासनास कळवावे. सदर लेखाशिर्षाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबधित उपायुक्त (आस्थापना) हे काम पाहतील.

६. विभागीय आयुक्त कार्यालयाने प्रशिक्षण केंद्रास अनुदान वितरीत करताना वेतन/वेतनेतर या बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी. उपरोक्त नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच प्रशिक्षण केंद्राने वेतनाकरिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे याची पूर्वसूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी. त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतनाकरिता अनुदान वितरीत करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्वसूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित केंद्राच्या प्राचार्यांची असेल.

७. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत / सुविधा पुरवतील.

८. हा शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग १, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार अनुक्रमांक ४, परि. २७ (२) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०७२११००७३७९७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Madhuri Sonawane

Digitally signed by Madhuri Sonawane
DN: cn=Madhuri Sonawane, o=Rural Development Department, ou, email=madhuri.sonawane@nic.in, c=IN
Date: 2023.07.21 15:14:21 +05'30'

(माधुरी सोनावणे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत-

१. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
२. विभागीय आयुक्त, अमरावती (२ प्रती)
३. संचालक राज्य ग्रामीण विकास संस्था (यशदा), बाणेर रोड, पुणे
४. उप आयुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
६. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १, मुंबई.
७. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
८. वित्त विभाग, कार्यासन क्र. अर्थ-१७/व्यय-१५
९. प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, जि. अमरावती. (२ प्रती)
१०. कार्यासन क्र. वित्त-१, व वित्त-७ग्राम विकास विभाग
११. निवड नस्ती का.क्र. आस्था-१५, ग्राम विकास विभाग.